राज्यातील कोविड-१९ लसीकरणासाठी लस खरेदीस प्रशासकीय मान्यता व ECRP-II मधील मंजूर तरतुदीतून अनुदान वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२३/प्र.क्र.१७९/आरोग्य-७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १७ एप्रिल,२०२३.

**वाचा :-**

१) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण पुणे यांचे पत्र क्र.राकुकका/कक्ष-१२/लसीकरण/खरेदी प्रस्ताव/प्रमा/१८३७६-१८३७९/२३, दि.०५.०४.२०२३

**प्रस्तावना:-**

कोविड-१९ महामारीच्या वाढत्या प्रादुर्भावावर प्रतिबंधात्मक उपाययोजना अंतर्गत राज्यातील लोकसंख्येचे लसीकरण केंद्र शासनाच्या धोरणानूसार करण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या धोरणाप्रमाणे लसीकरणासाठी आवश्यक त्या लसी राज्यांना उपलब्ध करुन देण्यात येतात. प्रत्येक व्यक्तीस दोन मात्रा या प्रमाणे लसी उपलब्ध करुन देण्यात येतात. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार लस निर्मात्या कपंनीकडून ७५ टक्के लसी केंद्र शासनाला व २५ टक्के लसी खाजगी रुग्णालयांना वाटप होतात. केद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार केंद्र शासनाने निर्धारित केलेल्या दराने लसी खरेदी करण्यासंदर्भात राज्य शासनास मुभा आहे. सद्य:स्थितीत राज्यामध्ये कोविड -१९ या महामारीचे वाढत असलेले रुग्ण तसेच राज्यात कोविड लसीची असलेली कमतरता विचारात घेता तातडीची बाब म्हणून केंद्र शासनाला उपवादात्मक परिस्थितीमध्ये कोविड-१९ लसींचे खरेदी करण्यासाठी अटी व शर्ती शिथील करुन राज्य शासनास खरेदी करण्यास परवानगी देण्याबाबत सादर केलेल्या प्रस्तावाच्या अधीन तसेच राज्य शासनाचे उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती शिथील करुन तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाचा दि.२६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती शिथील करुन लसीची खरेदी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील आरोग्य सेवा संचालनालयाच्या खरेदी कक्षाकडून एक विशेषबाब म्हणून अपवादात्मक परिस्थितीमध्ये खरेदी करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात सद्य:स्थितीत कोविड-१९ या विषाणूचा वाढत असलेला प्रादुर्भाव व त्या अनुषंगाने वाढत असलेले रुग्ण याचा विचार करता राज्यामध्ये आवश्यक असलेल्या २,००,००० लसी केंद्र शासनाने निर्धारित केलेल्या प्रती लस रु.३४१.२५/- या दराने केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या भारत बायोटेक, हैद्राबाद या उत्पादक कंपनीकडून अपवादात्मक परिस्थितीमध्ये खरेदी करण्यास एक विशेषबाब म्हणून रु.६८२.५० लक्ष इतक्या रकमेच्या खरेदीस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर लसींची खरेदी करण्यासाठी केंद्र शासनाला मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावास केंद्र शासनाची मान्यता मिळण्याच्या अधिन राहून राज्य शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२) राज्य शासनाची खरेदी करण्यासाठी उद्योग ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १.१२.२०१६ च्या धोरणातील अटी व शर्ती शिथील करुन खरेदीस मान्यता देण्यात येत आहे.

३) सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्या अखत्यारीतील औषधे व वैद्यकीय उपकरणे खरेदी करण्यासाठी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील हाफकीन महामंडळाकडून खरेदी करण्या संदर्भातील अटी व शर्ती शिथील करुन सदर खरेदीस मान्यता देण्यात येत आहे.

४) प्रस्तुत लसीची खरेदी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या खरेदी कक्षाकडून करण्यात यावी.

५) सदरची खरेदी केंद्र शासनाच्या ECRP- II नुसार प्राप्त झालेल्या निधीतून करावयाची असल्याने सदर निधीचे नियंत्रण असलेली मा.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखालील सनियत्रण समितीची कार्योत्तर मंजूरी घेण्याच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

६) सदर खरेदीसाठी आवश्यक असलेला खर्च ECRP-II अंतर्गत मंजूर झालेल्या FMR Code S.1, S.2, S.3, S.4, & S.8 मधील सन २०२२-२३ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

७) सदर कोविड-१९ करीता लसीची आवश्यकता/ मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी खरेदीची प्रक्रिया राबविण्यात यावी.

८) सदर कोविड-१९ लसीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

९) खरेदी करण्यात येणाऱ्या लसींचा पुरवठा झाल्यानंतर सदर लसी विनावापर पडून राहणार नाहीत व त्याचा विहीत मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०१२१६२९२८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.04.17 16:31:31 +05'30'

**( राजेंद्र वि कुडले)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई / पुणे
३) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष ) मुंबई.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
६) महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयताात) मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई / पुणे
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) निवडनस्ती आरोग्य-७